नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयातील सुरजागड येथील १) नेंडेर व २) येलचील या ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी नव्याने निर्माण केलेल्या अस्थायी १०० पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-२८१९/प्र.क्र.११२ /पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर, २०२१

**वाचा:-**

१) शासन निर्णय,गृह विभाग क्र.अेपीओ-२८१७/प्र.क्र.१/पोल-३, दि.१४.०९.२०१८.
२) शासन निर्णय,गृह विभाग क्र.अेपीओ-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.२१.०९.२०२०.
३) शासन निर्णय,गृह विभाग क्र.अेपीओ-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.२६.०३.२०२१.
४) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.) यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/पो.अ.गडचिरोली/ /१००पदे/मुदतवाढ/२८/२०१९, दि.२६.०७.२०२१.
५) वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-२८१७/प्र.क्र.१/पोल-३,दि.१४.०९.२०१८ अन्वये नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयातील सुरजागड येथील लोखंडाच्या खाणीच्या संरक्षणासाठी १)नेंडेर व २) येलचील ०२ सक्षस्त्र पोलीस मदत केंद्राची निर्मिती करण्यास व या ०२ सक्षस्त्र पोलीस मदत केंद्राकरिता प्रत्येकी ५ पोलीस उप निरीक्षक व ४५ पोलीस शिपाई अशा एकूण १०० पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय दि.२६.०३.२०२१ अन्वये सदर पदांना दि.०१.०३.२०२१ ते दि.३१.०८.२०२१ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील दि.२६.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.) यांनी उक्त पदांना दि.०१.०९.२०२१ पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

उपरोक्त ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी निर्माण करण्यात आलेल्या पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| **१) नेंडेर सशस्त्र पोलीस मदत केंद्र** | | | |
| १. | पोलीस उपनिरीक्षक | रु. ९३००-३४८००+ ग्रेड पे ४३०० | ०५ |
| २. | पोलीस शिपाई | रु.५२००-२०२००+ ग्रेड पे २००० | ४५ |
| | | **एकूण पदे -** | ५० |

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| **२) येलचील सशस्त्र पोलीस मदत केंद्र** | | | |
| १. | पोलीस उपनिरीक्षक | रु. ९३००-३४८००+ ग्रेड पे ४३०० | ०५ |
| २. | पोलीस शिपाई | रु.५२००-२०२००+ ग्रेड पे २००० | ४५ |
| | | **एकूण पदे -** | ५० |
| | | **५०+५०** | १०० |

२. आता **सुरजागड येथील १) नेंडेर व २) येलचील या ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी**च्या आस्थापनेवरील उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या नव्याने निर्माण केलेल्या १०० अस्थायी पदांना **दिनांक ०१ सप्टेंबर,२०२१ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

३) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

४) सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.३ येथील दिनांक १०.०८.२०२१ च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २८.०२.२०२२ अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

३. सदरचा खर्च "मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस-१०९, जिल्हा पोलीस-१०९(००) (०१) जिल्हा पोलीस बल"यालेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.०८.२०२१ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९३०१९५०३१२०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rupali Sanjog Kabare

Digitally signed by Rupali Sanjog Kabare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, serialNumber=5cb43a03d973ff96aabbf02a74864a4681399fe663d8fbde0441a596beb3acdd, cn=Rupali Sanjog Kabare
Date: 2021.09.30 19:51:28 +05'30'

**( रूपाली कबरे )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र,कॅम्प.

३) जिल्हाधिकारी,गडचिरोली.

४) पोलीस अधीक्षक, गडचिरोली .

५) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई .

६) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

९) वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.

१०) निवड नस्ती.